**महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद**
**राज्यातील जलसंधारण कामांची पाहणी**
**अशासकीय सदस्यांनी करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : जसंप ४४१०/ प्र.क्र. ९/ जल-२०.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १९ एप्रिल २०१०.

वाचा : शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र

1. जसंप २००६/ प्र.क्र. ६३/ जल-२० दिनांक ३ जून २००६
2. जसंप २००९/ प्र.क्र. २५/ जल-२० दिनांक १ जून २००९

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन १ येथील शासन निर्णयाद्धारे मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार पुनर्रचना करण्यात आली असून, संदर्भाधीन २ येथील शासन निर्णयाद्धारे या परिषदेस पुढील आदेश होईपर्यंत मुदतवाढ देखील देण्यात आली आहे. या परिषदेच्या रचनेमधे जलसंधारणाचे कामांशी संबंध येणारे मंत्री मंडळाचे सदस्य, शासकीय अधिकारी व जलसंधारणात काम करणाऱ्या प्रतिथयश व कार्यरत अशा अशासकीय सदस्यांचा समावेश आहे. या परिषदेचे उपाध्यक्ष मा. श्री. विजय अण्णा बोराडे असून प्रमुख मार्गदर्शक मा. श्री. कि. बा. हजारे हे आहेत.

२. या परिषदेच्या आतापर्यंत दिनांक १९ जून, २००७, २४ नोव्हेंबर, २००८ व दिनांक १९ जानेवारी, २०१० रोजी एकूण तीन बैठका झाल्या आहेत. यापैकी दिनांक १९ जानेवारी, २०१० रोजी झालेल्या तिसऱ्या बैठकीमध्ये जलसंधारणाच्या आतापर्यंतच्या कामांचा आढावा घेण्यात आला. या बैठकीमधे जलसंधारण विभागाने केलेल्या सादरीकरणानंतर आतापर्यतच्या कामांची पाहणी जलसंधारण परिषदेवरील अशासकीय सदस्यांनी करण्याचा निर्णय झाला आहे. त्यानुसार अशासकीय सदस्यांनी जलसंधारण कामांचा आढावा घेण्याबाबतची कार्यपद्धती निश्चित करण्याबाबतची बाब शासनाचे विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावनेमधील परिच्छेद २ मधे नमूद केलेली पार्श्वभूमी लक्षात घेता जलसंधारणाच्या आतापर्यंत झालेल्या कामांची पाहणी करुन सूचना व शिफारशी करण्याबाबत अशासकीय सदस्यांची नियुक्ती खालीलप्रमाणे करण्यात येत आहे. तसेच, आढावा घेण्याकरीता खालीलप्रमाणे कार्यपद्धती निश्चित करण्यात येत आहे.

**वाटप केलेले क्षेत्र.**

| अशासकीय सदस्याचे नाव | जिल्हे |
|---|---|
| श्री मुकुंद घारे. | सातारा ,कोल्हापुर, सांगली, सोलापूर. |
| श्री प्रफुल्ल कदम. | ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग. |
| श्री डि एस लोहिया. | उस्मानाबाद, लातूर, नांदेड, परभणी. |
| श्री फादर रॉबर्ट. | हिंगोली, औरंगाबाद, बीड, जालना. |
| श्री क्रिस्पिन लोबो. | नाशिक, धुळे, नंदूरबार, पुणे. |
| श्री श्रीमंत माने. | अहमदनगर , अमरावती, जळगाव, बुलडाणा, |
| श्रीमती सुरेखाताई ठाकरे. | वाशिम, यवतमाळ, अकोला. |
| श्री गिरीष गांधी. | वर्धा, भंडारा, गोंदिया |
| श्री मधुकर खडसे. | नागपूर, चंद्रपुर, गडचिरोली |

२. या सदस्यांनी करावयाच्या पाहणीमध्ये पुढील बाबींचा समावेश राहील.

a. अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम, एकात्मिक पडीक जमीन विकास कार्यक्रम, राष्ट्रीय पाणलोट विकास कार्यक्रम, आंतरराज्य नदीखोरे विकास प्रकल्प, विदर्भ पाणलोट विकास मिशन, मराठवाडा पाणलोट विकास मिशन, गतिमान पाणलोट योजना, राष्ट्रीय कृषि विकास कार्यक्रमांतर्गत शेततळी योजना, के. टी. बंधारे, किसान रोपवाटीका, सामाजिक वनीकरणांतर्गत वृक्ष लागवड, नाबार्ड ग्रामीण पायाभुत सुविधा विकास निधी अंतर्गत मेगापाणलोट, एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन कार्यक्रम, एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रम(राज्य), आदर्श गाव योजना, पश्चिम घाट विकास कार्यक्रम इत्यादी कार्यक्रमांमधील उपचार कामांच्या अंमलबजावणीचा आढावा.

b. अनुक्रमांक a. येथे नमूद केलेल्या कार्यक्रमांच्या अंमलबजावणी करीताची प्रशासकीय बाबींची पूर्तता.

c. अनुक्रमांक a. येथे नमूद केलेल्या कार्यक्रमांतर्गत कामांचा इम्पॅक्ट इफेक्ट.

d. अनुक्रमांक a. येथे नमूद केलेल्या कार्यक्रमांबाबत सूचना व शिफारशी

३. अशासकीय सदस्यांना नेमून दिलेल्या जिल्ह्यांमधे सदस्यांचे पाहणी दौऱ्याचेवेळी आयोजनाचे सनियंत्रण जिल्हाधिकारी तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे राहील. अशासकीय सदस्यांच्या दौऱ्याचे नियोजन, वाहन व निवासव्यवस्था उपरोक्त अधिकाऱ्यांचे पर्यवेक्षणाखाली असेल.

४. अशासकीय सदस्यांच्या दौऱ्यांमधे प्रत्यक्ष आयोजन, स्थलदर्शी भेटी, प्रकल्प पाहणी, लेखनसामग्री पुरविणे, पाणलोटातील सहभागी व्यक्तिंशी चर्चा करणे, कागदपत्रे उपलब्ध करुन देणे ही जबाबदारी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचेवर राहील व ते अशासकीय सदस्यांमवेत दौऱ्यांमधे सहभागी होतील.

५. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी राबवित असलेल्या कार्यक्रमांच्या व्यतिरिक्त इतर कार्यक्रमांबाबत, कार्यक्रम राबविणाऱ्या अन्य यंत्रणा या जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांस सर्व बाबतीत सहकार्य करतील व दौऱ्यांची त्यांची जबाबदारी देखील जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे इतकीच राहील.

६. उपरोक्त नमूद पाहणी अहवाल सर्व अशासकीय सदस्यांनी शासनास दिनांक ३१ मे २०१० पूर्वी सादर करावा.

७. अशासकीय सदस्यांच्या पाहणी दौऱ्याकरीता येणारा खर्च मागणी क्र एल-४ ३४५१, सचिवालय, -आर्थक सेवा -०९०- सचिवालय - ग्राम विकास व जलसंधारण विभाग -०३- प्रवास खर्च/०५, कार्यालयीन खर्च (३४५१००८२) खाली भागविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४१९२२०४५२००१ असा आहे.

९. महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशांनुसार व नावाने.

(मि. का. फडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

1. मा. मुख्यमंत्री तथा अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद यांचे प्रधान सचिव.
2. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
3. मा.मंत्री (जलसंधारण व रोहयो) यांचे खाजगी सचिव.
4. मा.मंत्री (वने), सदस्य यांचे खाजगी सचिव.
5. मा.मंत्री (जलसंपदा), सदस्य यांचे खाजगी सचिव.
6. मा.मंत्री (महसूल), सदस्य यांचे खाजगी सचिव.
7. मा.मंत्री (नियोजन व वित्त), सदस्य यांचे खाजगी सचिव.
8. मा.मंत्री (ग्रामविकास), सदस्य यांचे खाजगी सचिव.
9. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद यांचे स्वीय सहाय्यक.
10. मा.राज्यमंत्री (जलसंधारण), सदस्य यांचे स्वीय सचिव.
11. मुख्य सचिव यांचे सचिव.
12. अपर मुख्य सचिव (वने).

13. प्रधान सचिव/ वित्त, नियोजन, आदिवासी विकास, कृषि, रोजगार व स्वयंरोजगार, जलसंधारण व रोहयो.
14. सचिव जलसंपदा, ग्रामविकास व पंचायत राज.
15. सहसचिव (जलसंधारण)
16. महासंचालक, यशदा, पुणे.
17. आयुक्त (कृषि).
18. प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर.
19. संचालक, वनामती.
20. संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र नागपूर (रिमोट सेंन्सिंग सेंटर).
21. संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे.
22. संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे.
23. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
24. मुख्य अभियंता लघु पाटबंधारे (स्था.स्त.) पुणे.
25. मा. श्री. अण्णा हजारे, प्रमुख मार्गदर्शक महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
26. कार्याध्यक्ष आदर्शगाव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे.
27. श्री. मुकुंद घारे, अफार्म, पुणे, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
28. श्री. मधुकर खडसे, धरामित्र, वर्धा. अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
29. डॉ. डी. एस्. लोहिया, मानवलोक, जालना. अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
30. डॉ. जयंतराव पाटील,बोर्डी, ठाणे, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
31. श्री. श्रीमंत माने, अकोला, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
32. श्री. फादर रॉबर्ट,अहमदनगर, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
33. श्री. प्रफुल्ल कदम, सांगोला, सोलापूर, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
34. श्रीमती सुरेखाताई ठाकरे, अमरावती, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
35. श्री. क्रीस्पीन लोबो, अहमदनगर, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
36. श्री. पोपटराव पवार, अहमदनगर, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
37. श्री. अरुण निकम, जळगाव, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
38. श्री. गिरीष गांधी, नागपूर, अशासकीय सदस्य महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.

प्रत उचित कार्यवाहीस्तव अग्रेषित

1. सर्व विभागीय आयुक्त,
2. सर्व जिल्हाधिकारी,
3. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
4. मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा पुणे.
5. सर्व उपायुक्त (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय,
6. सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
7. सर्व सहसंचालक, समाजिक वनीकरण,
8. सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
9. सर्व अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे स्थानिक स्तर,
10. सर्व मुख्य वन संरक्षक,
11. सर्व प्रादेशिक मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक/ उपवनसंरक्षक,
12. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
13. सर्व उपसंचालक सामाजिक वनीकरण.
14. उपसंचालक आदर्शगाव संकल्प व प्रकल्प समिती.
15. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर.

प्रत माहितीकरीता अग्रेषित,

1. प्रधान सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक,
2. सर्व सहसचिव/उपसचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहाय्यक,
3. कार्यासन अधिकारी जल-७, ८, ११ व १२ ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
4. निवडनस्ती जल-२०.